भूजलाशयीन मत्स्यव्यवसाय सहकारी संस्था (प्राथमिक), मच्छिमार विविध कार्यकारी सहकारी संस्था, जलाशयावर निर्माण करावयाचा संघ व भूजलाशयीन जिल्हा मच्छिमार संघ नोंदणीसाठी सुधारित निकष

महाराष्ट्र शासन
कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
शासन निर्णय क्रमांक : मत्स्यवि २०१७/प्र.क्र. ७१/पदुम १३
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई -४०० ०३२.
दि. ३० जून, २०१७

वाचा:-

१) शासन निर्णय क्र-मत्स्यवि.२०१४/प्र.क्र.९/पदुम-१३, दिनांक २६.६.२०१४.
२) आयुक्त मत्स्यव्यवसाय यांचे पत्र क्र. मत्स्यवि / ०९/ शासन निर्णय/ ११८/ २०१७, दि. २२.०२.२०१७.

प्रस्तावना - :

भूजलाशयीन मत्स्यव्यवसाय सहकारी संस्थांची नोंदणी मत्स्यव्यवसाय विभागाने तलाव /जलाशय मासेमारीसाठी ठेक्याने देण्याच्या धोरणातील निकष व महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० व नियम १९६१ मधील तरतुदींच्या आधारे करण्यात येत होते. मत्स्यव्यवसायाकरिता तलाव /जलाशय मासेमारीसाठी ठेक्याने देण्याबाबतचे सुधारित धोरण राबवण्याचा निर्णय शासनाने घेतलेला आहे. सहकार विभागाने ९७ व्या घटना दुरुस्तीअन्वये, सहकारी संस्थांच्या कामकाजामध्ये अमुलाग्र बदल घडवून संस्थांचा गुणात्मक विकास करणेचे धोरण स्विकारले आहे. सदरील बदलांचा मत्स्यव्यवसाय सहकारी संस्थांच्या कामामध्ये समावेश करणे व मत्स्यविभागाचे धोरण व भूजलाशयीन मत्स्यव्यवसाय सहकारी संस्था (प्राथमिक) जलाशयावर निर्माण करावयाचा संघ व भूजलाशयीन जिल्हा मच्छिमार संघ नोंदणीचे धोरण यामध्ये सुसूत्रता व एकवाक्यता आणण्याकरिता पुर्वीचे सर्व शासन निर्णय व परिपत्रके एकत्रित समायोजित करुन दिनांक २६/०६/२०१४ चा शासन निर्णय निर्गमित करण्यात आला होता.

भूजलाशयीन मत्स्यव्यवसाय सहकारी संस्था, जलाशयावर निर्माण करावयाचा मत्स्यव्यवसाय सहकारी संस्थांचा संघ व भूजलाशयीन मच्छिमार संघ नोंदणीचे धोरण याबाबत मच्छिमारांनी तलाव ठेका धोरणात दिलेल्या स्थगितीच्या अनुषंगाने जी निवेदने दिले आहेत. त्याचा सर्वकष विचार करुन व दिनांक २६.६.२०१४ रोजीचा नोंदणीबाबतचा शासन निर्णय निष्कर्षित करुन स्वयंस्पष्ट व सर्व समावेशक व सर्वकष सुधारित शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**:-

शासन या निर्णयाद्वारे महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० मधील तरतुदी व निकषांच्या आधारे मत्स्यव्यवसायाकरिता तलाव/जलाशयावर भूजलाशयीन मत्स्यव्यवसाय सहकारी संस्था (प्राथमिक), मच्छिमार विविध कार्यकारी संस्था व २००० हेक्टर वरील जलाशयावर निर्माण करावयाचा भूजलाशयीन मत्स्यव्यवसाय सहकारी संघ तसेच, भूजलाशयीन जिल्हा मत्स्यव्यवसाय सहकारी संघ नोंदणी करण्याचे सुधारीत निकष खालीलप्रमाणे निश्चित करण्यास मान्यता देत आहे.

क्रियाशिल मच्छिमार :-

ज्या व्यक्तीचा प्रत्यक्ष मासेमारी करणे हाच उद्योग असून ज्याचा उदरनिर्वाह संपूर्णत: मासेमारीवर अवलंबून आहे, अशा व्यक्तीस क्रियाशिल मच्छिमार म्हणून संबोधिण्यात यावे.

**१) गोडया पाण्यातील मत्स्यव्यवसाय संस्थांची नोंदणी दोन प्रकारे करण्यात येईल. -**

**अ ) प्राथमिक भूजलाशयीन मच्छिमार सहकारी संस्था -** ज्या मच्छिमार संस्थेमधील सर्व सभासद क्रियाशिल मच्छिमार असून त्यांचा व्यवसाय मासेमारी करणे असा असेल त्या भूजलाशयीन मच्छिमार सहकारी संस्थेस प्राथमिक भूजलाशयीन मच्छिमार सहकारी संस्था असे संबोधण्यात येईल.

**नोंदणी निकष**

**१.१ -** ज्या तलावावर संस्था नोंदणी करावयाची आहे, त्या तलावाबाबतचे नाहरकत प्रमाणपत्र संबंधित जिल्हयाचे सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय यांनी देणे आवश्यक आहे. सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय यांनी नाहरकत सुसाध्यता प्रमाणपत्र पारित करणेपूर्वी खालील बाबी तपासणे अनिवार्य राहील.

**१.१.१** नियोजित संस्थेकडे उपलब्ध होणारे जलक्षेत्र.

**१.१.२** क्रियाशील मासेमार / सभासदांना प्रत्यक्ष मासेमारी करता येते की नाही याबाबत तांत्रिक अधिका-यामार्फत तपासणी .

**१.१.३** तलाव/जलाशय यांचे पाटबंधारे / जलसंधारण विभागाकडून हस्तांतरीत झाल्याचे प्रमाणपत्र आवश्यक. (सदरील प्रमाणपत्र हे पाटबंधारे /जलसंधारण विभागाचे कार्यकारी अभियंता यांचेपेक्षा कमी दर्जाच्या अधिकाऱ्याचे नसावे.)

**१.१.४** पाटबंधारे/ जलसंधारण विभागाकडून मत्स्यविभागाकडे हस्तांतरीत झालेल्या तलाव / जलाशय व्यतिरिक्त इतर तलावांचा समावेश नाहरकत प्रमाणपत्रामध्ये करता येणार नाही.

**१.१.५** तलाव / जलाशयापासून ५ किमी परिघाच्या अंतराचे प्रमाणपत्र. (सदरील प्रमाणपत्र हे संबंधित रस्ते बांधकाम करणाऱ्या विभागाचे / प्राधिकरणाचे कार्यकारी अभियंता तथा समकक्ष अधिकारी यांचेपेक्षा कमी दर्जाच्या अधिकाऱ्याचे नसावे.)

**१.१.६** तलाव / जलाशय यापासून एकूण मिळणारे मत्स्योत्पादन याबाबतचे प्रमाणपत्र. नियोजित संस्थेच्या तलावापासून किमान मत्स्योत्पादन वार्षिक सरासरी ८००० किलो असावी.

**१.१.७** नाहरकत प्रमाणपत्र पारित करणेपूर्वी प्रादेशिक उपायुक्त मत्स्यव्यवसाय यांची परवानगी / मान्यता घेणे आवश्यक आहे.

**१.२** - पाटबंधारे / जलसंधारण तलावांचे / जलाशयांचे मत्स्यविभागाकडे हस्तांतरण झाल्यानंतरच एखादया नियोजित संस्थेची स्थापना करणेबाबतची कार्यवाही करणे सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय व सहाय्यक निबंधक (दुग्ध) यांना बंधनकारक राहील.

**१.३** - संस्था नोंदणीच्या वेळी संस्थेचे कार्यक्षेत्र ज्या तलावावर / जलाशयावर नोंदणी करावयाची आहे, त्या तलावापुरते मर्यादित राहील व नियोजित संस्थेचे मासेमारी करिता कार्यक्षेत्र मर्यादा ५ कि.मी. राहील.

**१.४** - नियोजित संस्थेमध्ये निर्धारित तलाव / जलाशयाच्या बाधित गावामधील तसेच ५ कि.मी. परिघाच्या परिसरातील गावामधील क्रियाशील मच्छिमारांच्या समावेश करता येईल. नियोजित प्राथमिक मत्स्यव्यवसाय सहकारी संस्था नोंदणी प्रस्तावात स्थानिक, प्रकल्पग्रस्त, महिला, अनुसुचित जाती / जमाती यांचा समावेश असणे आवश्यक आहे.

**१.५** - संस्था नोंदणीसाठी किमान २५ क्रियाशील सभासद असावे व नियोजित संस्थेचे वसुल भाग भांडवल किमान रु.२५०००/- असावे.

**१.६** - नियोजित संस्थेच्या नोंदणीच्यावेळी मत्स्यव्यवसायासाठी उपयोगी असे बारमाही तलाव / जलाशय यांचे कमीत कमी जलक्षेत्र सरासरी १०० हेक्टर असावे. (सरासरी जलक्षेत्र = कमाल जलक्षेत्र + किमान जलक्षेत्र /२) जलक्षेत्र उपलब्धतेबाबत पाटबंधारे/जलसंधारण विभागाच्या कार्यकारी अभियंता यांचे प्रमाणपत्र ग्राहय धरण्यात येईल. नियोजित संस्थेची नोंदणी करिता उपलब्ध जलक्षेत्रामध्ये (सरासरी १०० हेक्टर) १० हेक्टर पेक्षा अधिक जलक्षेत्र असणाऱ्या एकापेक्षा अधिक तलावांचा (एकत्रितरित्या सरासरी १०० हेक्टर जलक्षेत्र) समावेश करता येईल.

**१.६.१** बारमाही तलाव जलक्षेत्र १०० हेक्टर पेक्षा जास्त असल्यास १०० हेक्टर एकक मानून २०० हेक्टर तलाव / जलाशयावर दोन प्राथमिक संस्थांची नोंदणी करता येईल.

**१.६.२** २००.०१ हेक्टर ते १००० हेक्टर क्षेत्र विचारात घेऊन प्रथम २०० हेक्टर क्षेत्रासाठी १०० हेक्टर एकक मानून दोन संस्था स्थापन कराव्यात. सदर २०० हेक्टर क्षेत्र

वजा जाता उर्वरित क्षेत्रासाठी ४०० हेक्टर एकक धरुन दोन संस्था नोंदणी करता येतील. अशाप्रकारे १००० हेक्टर पर्यत जास्तीत जास्त चार संस्था नोंदणी करता येतील. मात्र यापूर्वी चार पेक्षा जास्त प्राथमिक मत्स्यव्यवसाय सहकारी संस्थाची नोंदणी झाली असल्यास, अशा सर्व संस्थांचे अस्तित्व ग्राहय धरण्यात येईल.

**१.६.३** १०००.०१ हेक्टर व अधिक क्षेत्रासाठी प्रथम १००० हेक्टर करिता वरीलप्रमाणे चार संस्था नोंदणी करता येईल. १००० हेक्टर वजा जाता उर्वरित क्षेत्रासाठी १००० हेक्टर एकक धरुन उपलब्ध जलक्षेत्रानुसार संस्था नोंदणी करता येतील.

**१.६.४** तलाव / जलाशयावर नोंदणी झालेल्या मच्छिमार सहकारी संस्थांपैकी ज्या नोंदणीकृत प्राथमिक मच्छिमार सहकारी संस्था व मच्छिमार संघ यांना ठेका प्राप्त होईल अशा संस्था/संघ यांनी त्या तलाव/जलाशयावर नोंदणीकृत इतर मच्छिमार सहकारी संस्थेच्या सभासदास मासेमारी (रोजगार) उपलब्ध करुन देणे बंधनकारक राहील.

**१.६.५** भूजलाशयीन पाण्यातील मत्स्यव्यवसाय सहकारी संस्थांची नोंदणी प्रस्ताव संबंधित जिल्ह्याचे सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय यांचेकडे ना-हरकत प्रमाणपत्रासाठी संबंधित जिल्ह्याचे सहाय्यक निबंधक संस्था (दुग्ध) यांनी पाठवावा व सदरचे नाहरकत प्रमाणपत्र प्राप्त झाल्यानंतर महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० कायदयातील तरतुदीनुसार नोंदणीबाबत पुढील कार्यवाही करावी.

**ब) मच्छिमार विविध कार्यकारी सहकारी संस्था** - ज्या मच्छिमार संस्थेमधील सभासद क्रियाशिल/अक्रियाशिल मच्छिमार असून त्यांचा व्यवसाय, मासळी विक्री, मासळी प्रक्रिया, मासळी निर्यात, जाळे विणणे, बर्फ तयार करणे/बर्फ कारखाने इत्यादी मासळीशी संलग्न असणारे कामकाज असा असेल त्या भूजलाशयीन मच्छिमार सहकारी संस्थेस मच्छिमार विविध कार्यकारी सहकारी संस्था असे संबोधण्यात येईल.

**नोंदणी निकष**

१.१ नियोजित संस्थेचे कार्यक्षेत्र मुख्यालयापासून ५ किमी परिघाचे अंतरापर्यत असेल. (सदरील प्रमाणपत्र हे सार्वजनिक बांधकाम विभागाचे कार्यकारी अभियंता यांचेपेक्षा कमी दर्जाच्या अधिकाऱ्याचे नसावे.)

१.२ नियोजित संस्थेमध्ये मासेमारी संबंधित व्यवसाय करणारे जसे विक्री, निर्यात, प्रक्रिया, बर्फ तयार करणे, जाळे विणणे इ. कामकाज करणाऱ्या किमान २० सभासद असावे. व नियोजित संस्थेचे वसुल भागभांडवल २०,००० असावे.

१.३ नियोजित संस्थेच्या नोंदणी प्रस्तावामध्ये स्थानिक प्रकल्पग्रस्त महिला, अनुसुचित जाती/जमाती यांचा समावेश असावा.

१.४ नियोजित संस्थेच्या कार्यक्षेत्रामध्ये दुसरी मच्छिमार विविध कार्यकारी सहकारी संस्था स्थापन करता येणार नाही.

१.५ नियोजित संस्थेस तलाव ठेका घेता येणार नाही.

१.६ नियोजित संस्थेच्या कार्यक्षेत्रामधील प्राथमिक मत्स्यव्यवसायिक सहकारी संस्थाच्या सभासदांना नियोजित संस्थेचे सभासदत्व घेता येईल.

१.७ भूजलाशयीन पाण्यातील मत्स्यव्यवसाय विविध कार्यकारी सहकारी संस्थांची नोंदणी प्रस्ताव संबंधित जिल्ह्याचे सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय यांचेकडे मान्यतेसाठी संबंधित जिल्ह्याचे सहाय्यक निबंधक सहकारी संस्था (दुग्ध) यांनी पाठवावा व सदरची मान्यता प्राप्त झाल्यानंतर महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० कायदयातील तरतुदीनुसार नोंदणीबाबत पुढील कार्यवाही करावी.

**२) २००० हेक्टर जलक्षेत्रावरील जलाशयावर मत्स्यव्यवसाय सहकारी संस्थांचा संघ नोंदणी बाबत करावयाचे निकष –**

**२.१ –** २००० हेक्टर वरील जलाशयावर नोंदणी झालेल्या मत्स्यव्यवसाय सहकारी संस्थांच्या संघास भूजलाशयीन जलाशयावरील मत्स्यव्यवसाय सहकारी संस्थांचा संघ असे संबोधण्यात येईल.

**२.२** - २०००.०१ हेक्टर जलाशयावर एका मत्स्यव्यवसाय सहकारी संघाची नोंदणी करता येईल.

**२.३** - जलाशयावरील भूजलाशयीन मत्स्यव्यवसायिक सहकारी संघाचे नोंदणीसाठी किमान ५ प्राथमिक मत्स्यव्यवसाय सहकारी संस्था सभासद असणे आवश्यक राहील. मात्र व्यक्तीगत सभासदत्व धारण करता येणार नाही.

**२.४** - सदर नियोजित संघाचे नोंदणीचे वेळी किमान भागभांडवल रु.५००००/- इतके असावे.

**२.५ –** जलाशयावरील नियोजित भूजलाशयीन मत्स्यव्यवसाय सहकारी संघाचे कार्यक्षेत्र ज्या जलाशयावर संघाची नोंदणी करावयाची आहे, त्या जलाशयापुरते मर्यादित राहील.

**२.६ –** जलाशयावर स्थापन मत्स्यव्यवसाय सहकारी संघाकडून प्रमुख कार्प माशांची वार्षिक विक्री किमान १,००,००० किलो (१०० मेट्रिक टन) पर्यंत असावी.

**२.७** - सदर नियोजित संघांच्या नोंदणीपुर्वी प्रादेशिक उपायुक्त मत्स्यव्यवसाय यांचे नाहरकत प्रमाणपत्र घेणे आवश्यक राहील.

**२.८**- सदर जलाशयावरील नियोजित भूजलाशयीन मत्स्यव्यवसायिक सहकारी संघाचा प्रस्ताव संबंधित जिल्हयाच्या सहाय्यक निबंधक सहकारी संस्था (दुग्ध) यांनी छाननी करुन सहकार कायदयातील तरतुदीनुसार प्रस्ताव प्राप्त झाल्यापासुन १५ दिवसाच्या

आत उपनिबंधक सहकारी संस्था (मत्स्य) महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे कार्यालयात नोंदणीसाठी सादर करणे बंधनकारक राहील.

२.९ – उपनिबंधक सहकारी संस्था (मत्स्य) महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी सदर प्रस्ताव प्राप्त झाल्यापासून दोन महिन्याच्या आत शासनाचे वेळोवेळी निर्गमित परिपत्रके व महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० या कायदयातील तरतुदीनुसार आयुक्त मत्स्यव्यवसाय तथा अतिरिक्त निबंधक सहकारी संस्था (मत्स्य) यांच्या मान्यतेने नोंदणी करावी.

२.१० – अशा नोंदणी झालेल्या जलाशयावरील संघांना मत्स्यव्यवसायाशी संबंधित असलेले मासेमारी व्यतिरिक्त इतर उद्योग उदा. सुरक्षण, प्रक्रिया, वाहतूक व विक्री इ. व्यवहार ज्या जलाशयावर संघांची नोंदणी झाली आहे, त्या जलाशयापुरते करता येईल.

३. **भूजलाशयीन जिल्हा मच्छिमार सहकारी संघाचे निकष** – या मच्छिमार संघामध्ये जिल्हयामधील प्राथमिक / विविध कार्यकारी मच्छिमार सहकारी संस्था व मासेमारी करणारे प्रत्यक्ष मच्छिमार असे असतील.

३.१ नवीन भूजलाशयीन जिल्हा मत्स्यव्यवसाय संघ स्थापन करण्यासाठी कार्यक्षेत्रात किमान १० प्राथमिक मत्स्यव्यवसाय सहकारी संस्था असणे आवश्यक राहील.

३.२ नवीन निर्माण होणाऱ्या भूजलाशयीन जिल्हा मत्स्यव्यवसाय संघाचे किमान भागभांडवल रु. १.०० लाख राहील.

३.३ एका जिल्हयात एकापेक्षा जास्त भूजलाशयीन जिल्हा मच्छिमार सहकारी संघ स्थापन करता येणार नाहीत.

३.४ भूजलाशयीन जिल्हा मच्छिमार सहकारी संघाकडून प्रमुख कार्प माशांची वार्षिक विक्री किमान २ लाख किलो (२०० मेट्रीक टन) इतकी असावी.

३.५ पूर्वी अस्तित्वात असलेले निकष कायम राहतील. परंतु आता जलाशयाच्या कार्यक्षेत्रावर निकष क्र. २.२ ते २.६ प्रमाणे होणाऱ्या नवीन भूजलाशयीन जलाशयावरील मत्स्यव्यवसाय सहकारी संघ यांना जिल्हा मच्छिमार सहकारी संघाचे सभासदत्व जिल्हा मच्छिमार सहकारी संघास देणे आवश्यक राहील.

वर नमूद केलेल्या सुधारित निकषाप्रमाणे नवीन नोंदणी होणाऱ्या भूजलाशयीन मत्स्यव्यवसाय सहकारी संस्था (प्राथमिक) निर्माण करण्याबाबतची कार्यवाही सहाय्यक निबंधक सहकारी संस्था (दुग्ध) व भूजलाशयीन जलाशयावरील मत्स्यव्यवसाय सहकारी संघ व नवीन जिल्हा मत्स्यव्यवसाय सहकारी संघ निर्माण करण्याबाबतची कार्यवाही सहाय्यक निबंधक सहकारी संस्था (दुग्ध) उपनिबंधक

सहकारी संस्था (मत्स्य) आयुक्त मत्स्यव्यवसाय तथा अतिरिक्त निबंधक सहकारी संस्था (मत्स्य) यांनी तात्काळ करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१७०७०११४०४००७८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shri Ravindra Gurav

Digitally signed by Shri Ravindra Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And Adf Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0030b22364370f4d96ab251b7263219586c0069b661c3f9cd6fd67e55000ce92, cn=Shri Ravindra Gurav
Date: 2017.07.01 14:00:46 +05'30'

**(रविन्द्र गुरव)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत –**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
४. सर्व मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
५. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधानपरिषद यांचे खाजगी सचिव
६. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
७. अप्पर मुख्य सचिव (महसूल) मंत्रालय, मुंबई ३२
८. प्रधान सचिव (वित्त) मंत्रालय मुंबई ३२
९. प्रधान सचिव (वने) मंत्रालय मुंबई ३२
१०.प्रधान सचिव (ग्रामविकास) मंत्रालय मुंबई ३२
११.सचिव (सहकार) मंत्रालय मुंबई ३२
१२.प्रधान सचिव (आदिवासी विकास) मंत्रालय मुंबई ३२
१३.प्रधान सचिव (सामाजिक न्याय) मंत्रालय मुंबई ३२
१४.सचिव (जलसंपदा) मंत्रालय मुंबई ३२
१४. सचिव (लक्षेवि) मंत्रालय मुंबई ३२
१५. आयुक्त मत्स्यव्यवसाय महाराष्ट्र राज्य, मुंबई
१६. आयुक्त सहकार पुणे
१७. सर्व विभागीय आयुक्त
१८. सर्व जिल्हाधिकारी
१९. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद
२०. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र मत्स्योदयोग विकास महामंडळ, मुंबई
२१. सर्व आयुक्त महानगरपालिका
२२. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णाखोरे विकास महामंडळ सिंचन भवन पुणे

२३. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद
२४. कार्यकारी संचालक महाराष्ट्र विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर
२५. कार्यकारी संचालक महाराष्ट्र तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव
२६. कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ ठाणे
२७. सर्व उपायुक्त, मत्स्यव्यवसाय
२८. सर्व विभागीय सहआयुक्त निबंधक सहकारी संस्था
२९. उपनिबंधक सहकारी संस्था (मत्स्य) आयुक्त मत्स्यव्यवसाय यांचे कार्यालय, मुंबई.
३०. सर्व जिल्हा सहाय्यक निबंधक, सहकारी संस्था (दुग्ध)
३१. सर्व जिल्हा मत्स्यव्यवसाय विकास अधिकारी
३२. महालेखापाल (लेखापरिक्षक / लेखा अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर
३३. वित्त विभाग (व्यय २) मंत्रालय मुंबई ३२
३४. सर्व कृषि व पदुम विभागातील कार्यासने / निवड नस्ती.